**एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ७ या प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता गट-अ आणि गट-ब या संवर्गातील प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांसाठी निर्माण केलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. टिआरएन-२०२२/प्र.क्र.१३/उद्योग-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२४

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, उ.ऊ.व का. विभाग क्रमांक इएसटी २०१५/३९८/प्र.क्र.११०/उद्योग-३, दि.७.१०.२०१५
३) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. : टिआरएन ०९२१/प्र.क्र.४२/सीपीटीपी, दि.१०.०१.२०२२
४) सामान्य प्रशासन विभाग शासन कार्यालयीन क्र. टिआरएन १०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ, दि.१३.०१.२०२२, आणि दि.२४.१२.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग शासन कार्यालयीन क्र. टिआरएन १०२१/प्र.क्र.३७/सीपीटीपी-ब, दि.२४.१२.२०२१
६) उद्योग, उर्जा, कामगार विभाग शासन निर्णय क्र.टिआरएन २०२२/४४/प्र.क्र.१३/उद्योग-३, दि.०३.०२.२०२२
७) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.०५/प्रशि-२, दि.१८.०१.२०२४
८) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. टिआरएन-०१२४/प्र.क्र.०६/प्रशि-३, दि.१८.०१.२०२४
९) उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२४/प्र.क्र.५०/२४/उद्योग-३ दि.१४.०३.२०२४
१०) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब संवर्गातील पदांसाठी दोन वर्षाच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ४ आणि ५ येथील पत्रान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम - ७ अंतर्गत या विभागाच्या अधिनस्त असलेल्या उद्योग संचालनालयातील उद्योग उपसंचालक (तां) गट-अ या संवर्गातील एकूण ०६ आणि उद्योग अधिकारी (तां) गट-ब या संवर्गातील एकूण २३ पदे समाविष्ट करण्यात आली आहेत. सदर एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ संदर्भात संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार या विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ या संवर्गामध्ये ०६ आणि उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब या संवर्गामध्ये एकूण २३ अधिसंख्य पदे दि.१७.०१.२०२२ पासून दोन वर्षाकरीता निर्माण करण्यात आली असून त्यांची मुदत दि.१६.०१.२०२४ रोजी संपुष्टात येत आहे.

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील गट-अ आणि गट-ब संवर्गातील प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा सत्र-३ व सत्र-४ च्या परीक्षेचा निकाल जाहिर होऊन संबंधित प्रशिक्षणार्थींची सेवाज्येष्ठता निश्चित करण्याकरीता लागणारा कालावधी विचारात घेता सदर प्रशिक्षणार्थी ज्या ठिकाणी खातेनिहाय जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत त्या ठिकाणी त्यांना विभागीय संवर्ग वाटप होईपर्यंत कार्यरत ठेवण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ७ आणि ८ येथील पत्रान्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब संवर्गातील एकूण २३ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांपैकी ०३ अधिकाऱ्यांची नियुक्ती रद्द/ कार्यमुक्त करण्यात आलेले आहे. त्यामुळे सद्यस्थितीत संदर्भ क्र. ९ येथील समक्रमांकित दोन शासन निर्णयांन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत उद्योग उपसंचालक (तां) गट-अ या संवर्गातील एकूण ६ तर उद्योग अधिकारी (तां) गट-ब या संवर्गातील एकूण २० परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना विभागीय संवर्ग वाटप करण्यात आले आहे. तथापि सदर अधिकाऱ्यांना दि.१६.०१.२०२४ पासून दि.१४.०३.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग उप संचालक (तांत्रिक), गट-अ संवर्गामध्ये निर्माण करण्यात आलेल्या ०६ आणि उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब या संवर्गामध्ये निर्माण करण्यात आलेल्या २० अधिसंख्य पदांना दि.१७.०१.२०२४ पासून दि.१४.०३.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर मुदतवाढीच्या कालावधीतील संबंधित अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते त्यांना सद्यस्थितीत देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या कार्यालयांनी अदा करावे. उपरोक्त संदर्भ क्र. १० अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरून सदर मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१७४२४९९३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK
TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2024.03.28 17:52:38 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल -१ /२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक
४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
६. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. उपसचिव (सीपीटीपी- अव ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उप सचिव( प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.सर्व संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय.
१२.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.सर्व संबंधित परिविक्षाधीन अधिकारी (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१४.निवडनस्ती.